**राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करिता सहाय्य(Supoort to State Extension Programmes for Extension Reforms) या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीस सन २०१०-११ करिता अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुंसवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिका १७१०/प्र.क्र.३०४/३-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक: २० जानेवारी, २०११**

**संदर्भ :-** शासन निर्णय कृषि,पशुंसवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक

१) राविका १७०५/प्र.क्र.३८/३-अे, दिनांक २४ ऑक्टोबर, २००५
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- मि.सं./एफ नं.९-४/२००८-अेई,दि.१६ एप्रिल, २०१० चे पत्र.
३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक -मि.सं./एफ नं.२७-१८/२०१०-अेई,एक्सटेंशन डेस्क,दि.१४ जून, २०१० चे पत्र.
४)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ न. ३६-२८/२००९/ अेई/ एक्स्टेंशन. डेक्स दि. २१ जुलै, २०१० चे पत्र.
५) शासन निर्णय क्रमांक : कृषिका १७१०/प्र.क्र.१२३/३-अे, दि.२४ ऑगस्ट २०१०
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र . जा.क्र.कृ.आ/एक्यटे.रिफॉर्मस/विप्र ५/१० टक्के निधी/८०९//२०१०, दिनांक २५ ऑक्टोबर,२०१०

**प्रस्तावना**

कृषि विस्तार कार्यक्रम पुनर्जिवित करुन शेतकऱ्यांच्या गरजेनुरुप तसेच निकडीनुसार कृषि विस्तार कार्यक्रम राबविण्यासाठी **राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणांकरिता सहाय्य** ही केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के केंद्र व १० टक्के राज्य हिस्सा या तत्वावर केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सन २००५-०६ पासून राबविण्यात येत होती. **सन २०१०-११ करिता ही योजना जिल्हास्तरावर राबविण्याचे निश्चित झाले आहे. त्या अनुषंगाने प्रस्तावित निधी जिल्हाधिकाऱ्यांमार्फत संबंधित जिल्हयांना त्यांच्या आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल.** केंद्रिय कृषि मत्रालयाने **"राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करिता सहाय्य"** या योजनेचा सन २०१०-११ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधिन दि.१४ जून,२०१० च्या पत्रान्वये रु.३१९३.०४ लक्ष (रु.एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) च्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०१०-११ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधीन क्र.५ अन्वये राज्याची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि सन २०१०-११ करिता आयुक्तालयस्तरावरील खर्च भागविण्यासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. **"राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणाकरिता सहाय्य"** या योजनेचा कार्यक्रम राबविण्याकरिता केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१४ जून,२०१० च्या पत्रान्वये रु. ३१९३.०४ लक्ष (रु.एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) चा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या

मान्यतेच्या अधिन राहून सन २०१०-११ करिता मंजूर केलेल्या रु.३१९३.०४ लक्ष (रु.एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) च्या कार्यक्रम राबविण्यास राज्य शासनाची **प्रशासकीय** मान्यता देण्यात आली असून उपरोक्त योजनेतील केंद्र हिश्याचा ९० टक्के निधी केंद्रिय कृषि मंत्रालयामार्फत त्यांच्या संदर्भाधिन दि. २१ जुलै, २०१० च्या पत्रान्वये **वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार प्रशिक्षण संस्था, नागपूर या राज्याच्या शिखर प्रशिक्षण संस्थेकडे परस्पर जमा करण्यात आला आहे. सन २०१०-११** करिता **"राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणांकरिता सहाय्य" ही योजना जिल्हा योजना म्हणून राबविण्यात येणार असून राज्य हिश्याचा १० टक्के निधी जिल्हाधिका-यामार्फत संबंधित जिल्ह्यांना त्यांचे आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल. तेव्हा प्रस्तुत योजनेचा आयुक्तालय स्तरावरील खर्च भागविण्यासाठी रु.११.६० लक्ष** (रु.अकरा लाख साठ हजार मात्र) इतक्या निधीचा खर्च करण्यास राज्य शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१०-११ मध्ये सदर योजनेची अंमलबजावणी संदर्भाधीन दिनांक १६ एप्रिल,२०१० व १४ जून,२०१० च्या केंद्र शासनाच्या पत्रात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तीनुसार करण्यात यावी. या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वेळोवेळी घ्यावा तसेच खर्च केलेल्या अनुदानाचा घटक निहाय तपशिल राज्य शासनास विहीत मुदतीत पाठविण्याची दक्षता घ्यावी.

३. सन २०१०-११ करिता मंजूर केलेला रु.११.६० लक्ष (रु.अकरा लाख साठ हजार फक्त) हा राज्य हिश्याचा निधी खालील लेखाशिर्षाखालील मंजूर व अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र. डी-३
२४०१, पीक संवर्धन
१०९ विस्तार व प्रशिक्षण,
(०१)(४३) कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (राज्य हिस्सा)
(२४०१ ४४३६)
३३ - अर्थसहाय्य

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०३/११/व्यय-१, दि. २० जानेवारी,२०११अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०१२०१८५३१६००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(वीणा राऊत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर,
कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी,

सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (मृद व जलसंधारण), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे, (५ जादा प्रतींसह)
आयुक्त, सहकार, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हाधिकारी, ा
सर्व जिल्ह्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतींसह),
सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, -
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
संचालक (पणन), सहकार विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, रेशीम उद्योग पुणे मुंबई रस्ता, शासकीय दूध डेअरीसमोर, पुणे ४११ ००३
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर, कोल्हापूर, अमरावती, औरंगाबाद, नाशिक, खोपोली, दौंड
सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),नागपूर,
सर्व जिल्ह्यांचे जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्रंथपाल, विधिमंडळ सचिवालय ग्रंथालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग,( कृषि प्रभाग), मंत्रालय, मुंबई,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव,
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगीसचिव
निवड नस्ती, (कार्यासन ३-अे )